# नर्म विनोदी स्तंभलेखन

## E Book 132

## नर्म विनोदी स्तंभ लेखन

लेखक - शशिकांत ओक



### १. पावलांचे सांगाती

देह देवाचे मंदीर म्हणायची पद्धत आहे. त्या मंदिराचा भार पावलावर असतो. बालपणात मऊमऊ तळव्यांच्या अनवाणी पावलांनी बागडणारे पाय जरा मोठे झाले की आपले सांगाती शोधायला लागतात. काहींना काटे-सराटे बोचल्याने तर काहींना चिखल राड्यातून वाट काढायला लागल्याने बोटांच्या बेचक्यात काहीतरी सरकवून द्यावे लागते. आधी गरज नंतर शोभा म्हणून पावलांचे सांगाती जन्मभर जोडीने प्रवासाला बरोबर येतात. खडावा, पादुका, सपाता, वहाणा, जूता, शूज, सॅन्डल नावे बदलत राहतात. रंगरूप जीवनशैली प्रमाणे वरखाली होत जाते. पण संगत सुटत नाही.




गडकऱ्यांच्या 'एकच प्याला' नाटकात ते मजेने म्हणाले होते, कि पदवी व पत्नी एकदा चिकटली की जन्मभर चिकटते. सध्याच्या काळात मात्र पत्नीशी झटपट काडीमोड घेऊन जन्माची ब्याद मिटवता येते. तर बनावटी पदव्यांची पोल खुलली की पदवी देखील दुरावते. पावलांचा संगसाथ मात्र आजन्म राहतो.

चपलांपासून जोडे झिजवायची उमर येईपर्यंत बापाच्या पायाला घट्टे पडतात. तोवर मुलीचे पाय टाचा उंचाऊन, नेलपॉलिश लाऊन रंगीत बनतात. पोषाखाची रंगसंगती साधायला, अनेक जोड घराची शोभा वाढवतात.

कोल्हापुरी वहाणांचा बाज निराळा. करकर आवाज करणारी पायताणे घालून मोटार सायकलवर मांड टाकून उसाच्या फडातून वाट काढत, गर्दीच्या रस्त्यावरून जाताना बाचाबाचीत आवाज वाढवायची वेळ आली तर कानाखाली वाजवायला ती केंव्हाही हातात घेता येते. रस्यावरून जाणाऱ्या तरुणींची छेड काढणाऱ्या रोडरोमिओला वठणीवर आणायला उंच टांचांचे सॅन्डल शस्त्र म्हणून वापरायला येते.

स्लिपर्स थोरामोठ्यांच्या घरात बाथरूम, बेडरूममधे राज्य चालवतात. गरिबाला ती सर्वत्र साथ देते. चकचकीत शूज मधला बॉस भाव खाऊन जातो. दणकट बुटांचे खाडखाड आवाज करत परेड करत जाणाऱ्या जवानांना पाहून ऊर भरून येतो.

शूजशी मवाळ मोज्यांची गट्टी जमते. गमबुटात तेच मोजे पचपच झाले की एकएक पाऊल उचलणे दुरापास्त होते. नुकत्याच पडलेल्या बर्फावरून धिप्पाड स्नोशूजनी करकर करत चालायची मजा औरच. उन्हाळ्यात मात्र घामोळलेल्या मोज्यांना काढताना नाक दाबुन घरावे लागत.

पावलांचे लालित्य पहायचे तर बर्फावरील स्केटींग करताना सुंदर तरुण जोडीचे. नवरख्यांना त्याच चाकांच्या स्केटशी चाळा कधी उताणा पाडेल याचा नेम नाही.

आदिमानवापासून पावलांचे सांगाती वेगवेगळ्या रूपाने सजतात. तरूण चिरंजिवांच्या शूजचे हजाराचे आकडे ऐकले की बापाचा जीव थोडाथोडा होतो. ‘काही काळाने त्याची पुढची पिढी त्याला सतावेल तेंव्हा मजा येईल’, असे सांगून आई समजूत काढते. तेंव्हा बापालाही आपले तरुणपण आठवते.

मिपावरील निवडक प्रतिसाद 2416 वाचने

तरूण चिरंजिवांच्या शूजचे हजाराचे आकडे ऐकले की बापाचा जीव थोडाथोडा होतो. काही काळाने त्याची पुढची पिढी त्याला सतावेल तेंव्हा मजा येईल, असे सांगून आई समजूत काढते. तेंव्हा बापालाही आपले तरुणपण आठवते.

ही ही .. मजेदार ... :)

अहो नाडीवाले ओककाका,
सुंदर लेख. ते तेवढे नाड्यांच्या गुंत्यात अडकून पडू नका. असेच ललित लिखाण करत रहा.
पु.ले.शु. ( पुढील लेखनाकरिता शुभेच्छा)

## २ थाप

आयुष्यात असे अनेक प्रसंग येतात की आपली फजिती करून घ्यायची नसेल तर काही तरी शक्कल लढवून वेळ मारून न्यावी लागते. त्यावेळी सत्य-असत्य, खरे-खोटे

याची तात्विक चर्चा करायला उसंत नसते. सत्य नेहमीच बोलले पाहिजे अशी अट घालून जीवन जगता येत नाही. शेळीचे दूध व सहा मनुकांवर सर्वांना आयुष्य कंठता येत नाही. गैरसोईच्या सत्याला अक्कल चालवून खरे करण्याच्या कलेला "थाप" असा सोईचा शब्द आहे.

जीवनात पहिली थाप साधारणपणे 'उशीर का झाला ?' या यक्षप्रश्नाच्या उत्तरातून प्रसव पावते. सुरवातीला प्रसव वेदना होतात. पण मग शाळा-कॉलेजात नंतर ऑफिसात वरचेवर घडणाऱ्या पेचप्रसंगातून सराव होतो. पटाईतपणा येतो.

किरकोळ थापांपर्यंत ठीक कारण त्याचे फारसे कोणी मनावर घेत नाही. पण लफडी करणाऱ्यांना थापांचे वरदान लागते. कॉलेजात पोरींवरून, ऑफिसात प्रमोशनसाठी तर सार्वजनिक कार्यात खोट्या प्रतिष्ठेपायी थापांना ऊत येतो.

काहींना आपल्या खऱ्या गोष्टी देखील थापा असाव्यात असे ऐकणाऱ्याला वाटून नये म्हणून, 'आई शप्पत', 'आप बिलीव्ह नहीं करोगे', 'मैं झूट नही बोलता हूँ' अशी पुस्ती वारंवार जोडावी लागते.

फुशारकी थापेची नातलग. नसलेले गुण, पात्रता व हिम्मत फुशारकीला लागतात. शिकारी, लष्करातील शिपाईगडी यांना तिच्याविना राहवत नाही.




स्त्रीवर्गाला आपले वय आणि वजन सांगताना अभावितपणे थाप मारावी लागते. तेवढे सोडून बाकी गोष्टी फूगवून सांगण्यात त्यांना जे समाधान मिळते त्यामुळे त्या थापांना पुरूषवर्ग थाप मानतच नाहीत.

हास्यरस निर्मितीला अतिशयोक्ती हा गुण मानला तरी त्या थापाच असतात. आचार्य अत्र्यांनी साष्टांग नमस्कार नाटकात हा रस रावबहाद्दुरांच्या तोंडीच्या संवादात असा

घातला आहे. 'रामदास स्वामींच्या हजारोंच्या संख्येने काढलेल्या दंड-बैठकांमुळे शिवथर घळीत पुरूषभर मोठा खड्डा पडला आहे. पण ते काहीच नाही. पुढे ते फुगवून म्हणतात,

"आम्ही देखील काही कमी नाही. बसल्या बैठकीला आम्ही हजार-हजार साष्टांग नमस्कार घालतो. अगदी आगगाडीच्या प्रवासात देखील. आहात कुठे महाराजा? पण मनातल्या मनात !"

आता कै. प्रल्हाद केशव अत्र्यांसारखा नाटककार गेल्या ५०००वर्षात झाला नाही म्हणून त्यांना सगळेच शोभून दिसते.

******

शब्द संख्या २८०

-"हा लेख एकदम आवडला" आणि ही थाप नाही! :-)

-२८० शब्दांमधेच मधेच का उरकलेत? लिहा ना अजुन. चांगले लिहले आहे.

एकदा मोजले पाहीजेत २८० शब्द, नाहीतर थाप असायची.

- बर ओळखा बरे, लेख चांगला आहे हे खरे की थाप....? ;-)



-लेख आवडला...आणखी थापा चालल्या असत्या...मला रोज एक तरी थाप कोणाला तरी मारावी लागते.

एक थाप मात्र खरीखुरी थाप असते..तिला तुम्ही खोटी थाप असे नाही म्हणू शकणार...ओळखा पाहू...?

(तबला किंवा ढोलकी वर मारलेली थाप...)

-स्त्रीवर्गाला आपले वय आणि वजन सांगताना अभावितपणे थाप मारावी लागते. तेवढे सोडून बाकी गोष्टी फूगवून सांगण्यात त्यांना जे समाधान मिळते त्यामुळे त्या थापांना पुरूषवर्ग थाप मानतच नाहीत.

अचुक 'नाडी' पकडली ब्वॉ!

-चना जोर गरमची एकच फक्की मारुन तोंडाला पाणी सुटावे आणि चने संपून जावेत तसे झाले! ;)

## ३. स्मित रेषा

चेहऱ्यावरील काही स्नायूंच्या ताणांची परिणिती म्हणजे भाव दर्शन. ओठांची चंद्रकोर स्मितरेषा तर ओठांचा चंबू चुंबनाचा! कपाळाला आठ्या म्हणजे त्रासिकपणा तर उंचावलेल्या भुवया ताणले्ल्या अपेक्षा!

हसऱ्या चेहऱ्याचे नेहमीच स्वागत होते. खेटर खाल्लेला चेहरा कोणाला आवडणार? कदाचित पडेल चेहऱ्याच्या रडेल प्राण्याला!



स्मितरेषा म्हणजे मोफतका माल. चेहऱ्याची किंमत मात्र वाढवतो. स्मित नकली व असली प्रकारात मिळते. तोंड देखले स्मित पाठ वळताच मावळते. मोहक स्मित आठवणीत राहते.

स्मितकारी ओठांना ध्वनी मिळाला की हास्य बनते. तोच अधोभागातून आला तर हास्यास्पद ठरतो. हास्याची लागवण आनंदीपणाला निमंत्रण असते. घरात आनंदाचे चांदणे फुलवते. तर नोकरी धंद्यात सलोखा घडवते. मैत्रीवर आपलेपणाचा शिक्कामोर्तब करते.






हास्याला विनोदाचे वाहन मिळाले की अनेकांच्या स्मितरेषा फुलतात. पु. ल., दामुअण्णा मालवणकर, राजा गोसावी, जॉनी लीव्हर, सुनील पाल, राजू श्रीवास्तव, कपिल शर्मा यांच्या नुसत्या दर्शनाने पोट गदगदायला लागते. पोटाला व्यायाम मिळतो. भल्यामोठ्या तोंदाच्या लोकांना जग हसते. त्यांना जगाकडे बघून हसायला व्यायामप्रेमी हास्यक्लबचे सदस्य बनावे लागते.

काही जबड्याचे विश्वदर्शन करत हसतात तर काहींना विचित्र दंतपंगतींमुळे तोंडासमोर हात धरावा लागतो. काहींना चुटकुले, जोक सांगताना स्वतःहसायचे नसते याचा विसर पडतो. काहींना माहिती असलेला विनोद असेल तर आधीच हसायला येते. तर काहींची टयुब पेटायला उशीर लागतो. तोवर ते बळेबळे हसून वेळ साजरी करतात.



सरदारजी लोकांना नेहमी सावध राहावे लागते. कोण केंव्हा त्यांच्यावर जोक रचेल नेम नसतो. पंजाबात एका रेल्वेस्टेशनवर पटरीवर अनेक सरदारजी गाडीखाली चेंगरून मेले. एक सरदार मात्र वाचला. लोकांनी त्याला विचारले, “हे कसे काय झाले? तो म्हणाला, “सगळी चूक त्या अनौन्सरची होती. त्याने अनाउन्स केले की की आज गाडी ४ नंबर प्लॅट फॉर्मवर येत आहे”. ते एकून सर्व सरदार पटपट पटरीवर कुदले. तेवढ्यात गाडी त्यांच्या वरून गेली. ते मेले. मी जीव द्यायला पटरीवर पडलो होतो. मला फलाटावर छलांग मारावी लागली. पण गाडी पटरीवर आली अन् मी फुकट वाचलो!

एकदा सर्व सरदारजींनी ठरवले का आपली फार चेष्टा होते. यावर उपाय करण्यासाठी त्यांनी एक अधिवेशन भरवले. कुठल्याही तऱ्हेची चूक राहू न देता, चोख अधिवेशन पार पडले. लोक परतीसाठी स्टेशनवर जमा झाले. तेवढ्यात एक सरदार घाईघाईने प्रत्येकाला पुड्या वाटत सुटला व म्हणत होता, “जेवणात थोडे नमक कमी होते ते वाटतोय. उगाच तेवढ्याने कोणी खोट काढायला नको”!

मिपावरील 3687 वाचने

-बाकी ओक साहेब बदल सुखद !

छान वाटलं... जरा मोठे लेख लिहा ना.. वाचायला पण आनंद होईल.

- स्मितरेषा म्हणजे मोफतका माल. चेहऱ्याची किंमत मात्र वाढवतो.
वा! सही! :)

-चेहऱ्यावरील काही स्नायूंच्या ताणांची परिणिती म्हणजे भाव दर्शन. ओठांची चंद्रकोर स्मितरेषा तर ओठांचा चंबू चुंबनाचा! कपाळाला आठ्या म्हणजे त्रासिकपणा तर उंचावलेल्या भुवया ताणलेल्या अपेक्षा!

सही!!!!!!!

- लेख छान आहे. 'विनोद ' यावरच जास्त लिहिले असते,तर आणखी मजा आली असती. सरदारजीचे विनोद आता खरच बन्द करायला हवेत. चि.वि.जोशी, पु.ल.देशपान्डे किन्वा मंगला गोड्बोले यांच्या सारख्यानचे लेख वाचताना नकळतच हसु येते.चेहरा आनन्दी होतो.